ऊर्जा विभागाच्या अधिपत्याखालील विद्युत निरीक्षणालयातील अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि जात वैधता प्रमाणपत्र सादर करू न शकलेल्या अथवा अन्य जात प्रमाणपत्र सादर केलेल्या अधिकारी / कर्मचारी यांच्याकरिता अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. मुविनि-२०१९/प्र. क्र.१६५/ऊर्जा-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ०४ ऑक्टोबर, २०२१.

**संदर्भ:** (१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि. २१ डिसेंबर, २०१९.
(२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०२०/प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि. ३० जून, २०२०.
(३) मुख्य विद्युत निरीक्षक यांचे पत्र क्र. जा.क्र.मुविनि/कार्या-२/१५२६/२०१९, दि. २१ नोव्हेंबर, २०१९.
(४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि. २७ नोव्हेंबर, २०२०.

**प्रस्तावना:-**

सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधिन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हील अपील क्र. ८९२८/२०१५ (चेअरमन आणि मॅनेजिग डॉयरेक्टर एफसीआय व इतर विरुध्द जगदिश बालाराम बहिरा व इतर) व इतर याचिका यामध्ये दि. ०६.०७.२०१७ रोजी मागास जातींना असलेल्या आरक्षणाच्या आधारे शासकीय सेवेत दाखल झालेल्या व त्यानंतर जातीचे दावे अवैध ठरलेल्या व्यक्तींना शासकीस सेवेत संरक्षण देय ठरत नाही या निर्णयाची अंमलबजावणी करण्यासाठी मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर यांनी रिट याचिका क्र. ३१४०/२००८ मध्ये दि. २८.०९.२०१८ च्या आदेशान्वये मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार दि. ३१.१२.२०१९ पर्यंत कार्यवाही करण्याचे आदेश दिले असल्याने अशा अधिकारी / कर्मचारी यांची अधिसंख्य पदे निर्माण करुन या अधिसंख्य पदावर अधिकारी/ कर्मचारी यांना वर्ग करण्याची कार्यवाही करण्याच्या सूचना दिल्या आहेत. त्यास अनुसरुन उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या अधिनस्त विद्युत निरीक्षणालयातील अधिकारी/ कर्मचारी यांची अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अनुसूचित जमातीचे प्रमाणपत्र अवैध ठरलेले, अवैध ठरल्यानंतर विशेष मागास प्रवर्गाचे अथवा अन्य कोणत्याही मागास प्रवर्गाचे जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेले, अनुसूचीत जमातीचा दावा सोडून दिलेले, जात पडताळणी समितीकडे प्रस्ताव सादर न केलेले, जात पडताळणी समितीच्या निणर्याविरोधात मा. न्यायालयात याचिका दाखल केलेले मात्र मा. न्यायालयाने स्थगिती न दिलेल्या

विद्युत निरीक्षणालयातील अधिकारी / कर्मचाऱी यांची ०६ अधिसंख्य पदे निर्माण करण्यात येत आहेत. सदर पदांचा तपशील सोबतच्या विवरणपत्रात नमूद केलेला आहे.

२. सदर अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात येणाऱ्या अधिकारी/ कर्मचाऱ्यांपैकी सेवेत कार्यरत अधिकारी, सध्या ज्या पदावर कार्यरत आहेत. त्या पदाकरिता निर्माण करण्यात आलेले अधिसंख्य पद तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांकरिता किंवा ते सेवेत राहीले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत, ज्यापैकी जे आधी घडेल त्या दिनांकापर्यंत सदर अधिसंख्य पद अस्तित्वात राहील.

३. सदर अधिकारी/ कर्मचारी यांची ०६ अधिसंख्य पदे दिनांक ०४/१०/२०२१ पासून निर्माण करण्यात येऊन त्या अधिसंख्य पदांवर संबंधित अधिकारी/ कर्मचारी यांच्या सेवा वर्ग करण्यात येत आहेत.

४. अधिसंख्य पदावर वर्ग करण्यापूर्वी संबंधित अधिकारी/ कर्मचाऱ्यांना जेवढे मासिक वेतन व भत्ते मिळत होते तेवढे वेतन व भत्ते त्यांना पुढील आदेश होईपर्यंत देण्यात येतील.

५. अधिसंख्य पदांच्या वेतनावर येणारा खर्च हा संबंधित अधिकारी/ कर्मचारी सध्या ज्या कार्यालयात आहेत त्या कार्यालयाच्या वेतनासंबंधीच्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सामान्य प्रशासन विभागाच्या क्र. बीसीसी-२०१८/प्र.क.३०८/१६-ब, दि. २१.१२.२०१९ मधील तरतूदीनुसार व सामान्य प्रशासन विभागाच्या क्र. बीसीसी-२०२०/प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि. ३०.०६.२०२० अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२११००८१५५४०३२३१० असा आहे. उक्त शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

PRASHANT PUNDLIK BADGERI

Digitally signed by PRASHANT PUNDLIK BADGERI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=07ae22a8e7fa4047ce6ff816d85e77eec14db9926b325a140acf9b28bb990786, pseudonym=AC7259A119539CB47009F7E30F693EAB895718AB, serialNumber=EC955E2D360E1FDDB6ABAC58A907419053BEECEB5DBAC48A78C89C588FF71BEF, cn=PRASHANT PUNDLIK BADGERI
Date: 2021.10.08 15:57:48 +05'30'

**( प्रशांत पुं. बडगेरी )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा.राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
३. महालेखापाल-१/२, (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
४. अप्पर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (ऊर्जा) यांचे स्वीय सहाय्यक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.

७. मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, प्रशासकीय इमारत, ३ रा मजला, रामकृष्ण चेंबुरकर मार्ग, चेंबुर (पू.), मुंबई ७१,

८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/निवासी लेखाधिकारी, मुंबई.

९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

१०. अधीक्षक अभियंता, प्रादेशिक विद्युत निरीक्षण मंडळ, मुंबई/पुणे/औरंगाबाद/नागपूर,

११. उपसचिव (ऊर्जा ५) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ४०००३२.

१२. निवड नस्ती/ऊर्जा ५.

**(उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. मुविनि-२०१९/प्र. क्र. १६५/ऊर्जा-५, दि. ०४ ऑक्टोबर, २०२१ सोबतचे)**

**विवरणपत्र**

| अ.क्र. | अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे नाव व पदनाम | गट | अधिसंख्य पदावर वर्ग केल्याचा दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | संबंधित अधिकारी/ कर्मवारी यांच्यासाठी निर्माण करण्यात येणाऱ्या अधिसंख्य पदाचे पदनाम |
|---|---|---|---|---|---|
| १. | श्रीम. ज. म. तरोळे<br>शाखा अभियंता | ब | दि. ०४.१०.२०२१ | दि. ३१.०५.२०३४ | शाखा अभियंता |
| २. | श्री. दिलीप महादेवराव खोत<br>सहाय्यक विद्युत शुल्क निरीक्षक | क | दि. ०४.१०.२०२१ | दि.२८.०२.२०२७ | सहाय्यक विद्युत शुल्क निरीक्षक |
| ३. | श्री. एस. एस. भोबू<br>सहाय्यक विद्युत शुल्क निरीक्षक | क | दि. ०४.१०.२०२१ | दि. ३१.०३.२०२५ | सहाय्यक विद्युत शुल्क निरीक्षक |
| ४. | श्री. प्र. क.गारोडे<br>वरीष्ठ लिपीक | क | दि. ०४.१०.२०२१ | दि. ३०.०६.२०२९ | वरीष्ठ लिपीक |
| ५. | श्रीमती सरिता ना.कोटुरवार<br>वरीष्ठ लिपीक | क | दि. ०४.१०.२०२१ | दि. ३०.०९.२०३० | वरीष्ठ लिपीक |
| ६. | श्री. नरेंद्र सदानंद टाक्कर<br>शिपाई | ड | दि. ०४.१०.२०२१ | दि.३०.०७.२०२७ | शिपाई |